**“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एकछत्र योजनेंतर्गत पुरातत्व व वस्तु संग्रहालये संचालनालयास निधी वितरीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३ /प्र.क्र.४६४/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ५ मार्च, २०२४

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन पत्र क्र. संकिर्ण-८२२२/प्र.क्र.४१३/सां.का.४, दि.१७ फेब्रुवारी, २०२३
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारके-२०२३/प्र.क्र.२२१/सां.का.३, दि. १४ ऑगस्ट, २०२३
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, समक्रमांकाचा शासन निर्णय, दि. २३ नोव्हेंबर, २०२३
४) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारके-२०२३/प्र.क्र.२२१/सां.का.३, दि. २३ नोव्हेंबर, २०२३

**प्रस्तावना :-**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या कोअर समितीच्या दिनांक ५ डिसेंबर, २०२२ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त उपर्निर्दिष्ट क्र.१ च्या पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. सदर इतिवृत्तानुसार स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवा निमित्त इतर संरक्षित स्मारकांचे जतन व संवर्धन प्रकल्प याकरीता रुपये ९०.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

त्यानुसार पुरातत्व संचालनालयाच्या अखत्यारीतील तीर्थकुंड, तेर, ता.जि.धाराशिव या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरुस्ती कामाकरीता रुपये ५,११,६६,२०३/- इतक्या रकमेस उपर्निर्दिष्ट क्र. २ अन्वये प्रशासकीय व उपर्निर्दिष्ट क्र. ३ अन्वये वित्तीय मान्यता देण्यात आलेली आहे. सद्यस्थितीत सदर प्रयोजनार्थ उपर्निर्दिष्ट क्र. ४ अन्वये देण्यात आलेल्या सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने अधिकच्या वाढीव खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एकछत्र योजनेंतर्गत तीर्थकुंड, तेर, ता.जि.धाराशिव या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरुस्ती कामासाठी अधिकचा वाढीव खर्च रुपये १८,५७,१२२/- (रुपये अठरा लक्ष सत्तावण्ण हजार एकशे बावीस फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती , (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव, (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत कार्यक्रम (२२०५ ३७३३) - ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना निधी वितरणासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, त्यांना संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांचे कार्यालयातील अधिकारी यांना नियंत्रण अधिकारी घोषित करण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहे. संबंधित नियंत्रण अधिकारी यांनी प्राधिकृत केलेले अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी सदर प्रयोजनार्थाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत शासनास सादर करावे. तसेच, वेळोवेळी प्रगती अहवाल संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत शासनास सादर करण्यात यावा.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३०५१५५४००९१२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2024.03.05 16:40:49 +05'30'

**( अनिरुध्द सु. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) तथा अध्यक्ष कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४. उप सचिव ( सां.का.३, ४ व अर्थसंकल्प ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय
५. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, मुंबई
६. संचालक, पुरातत्व व वस्तु संग्रहालये संचालनालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१४. निवड नस्ती, सां.का.४.